**स्वाईन फ्ल्यू आजारावर खाजगी रुग्णालयात गंभीर स्थितीत जीवनावश्यक प्रणाली उपचार घेणा-या रुणांना खर्चाची प्रतीपुर्ती करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्वाईन २०१५/प्र.क्र.११३/आ-५**
जी.टी. रुग्णालय आवार, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
तारीख: २० मार्च, २०१५

वाचा -

**संचालक,आरोग्य सेवा, मुंबई यांचे क्र.संआसे/ कक्ष-६/ स्वाईन फ्ल्यू प्रति.उपाययोजना/ २०१५ दि.०४/०३/२०१५**

प्रस्तावना -

**एनफ्यूएंझा ए एच १ एन १ (स्वाईन फ्ल्यू) या विषाणूचा** उद्भव २००९ मध्ये मेक्सिको देशात झाला व त्यानंतर या विषाणूंचा हवेवाटे जगभर प्रसार झाला. हवेवाटे होणारा प्रसार, छोटा अधिक्षयन कालावधी, अल्पकाळ टिकणारी नैसर्गिक प्रतिकार शक्ती, समाजात आढळणारे लक्षण विरहित रुग्ण व लोकसंख्येची घनता या कारणांमुळे हा आजार अतिशय वेगाने पसरतो. राज्यात ०१ जानेवारी, २०१५ पासून स्वाईन फ्ल्यू आजाराचे रुग्ण बऱ्याच मोठया संख्येत आढळून आले असून परिणामत: मृतांच्या संख्येतही वाढ झाली आहे. स्वाईन फल्यू आजार वैयक्तीक स्वच्छता पाळल्यास पसरत नाही. तसेच लवकर उपचार केल्यास मृत्यू टाळता येतो. याकरीता मोठया प्रमाणात जनतेमध्ये जनजागृती होणे गरजेचे आहे. राज्यात पसरणाऱ्या स्वाईन फल्यू आजाराला प्रतिबंध व नियंत्रण करण्यासाठी विविध प्रसिध्दी माध्यमाद्वारे जनतेला आरोग्य शिक्षण देण्यात येत आहे. राज्यात स्वाईन फ्ल्यूचा प्रादुर्भाव वाढला असून सदर आजारावर उपचार घेण्यासाठी बरेच रुग्ण खाजगी रुग्णालयात जात आहेत. हे लक्षात घेता दि.०२ मार्च, २०१५ पासून जे रुग्ण खाजगी रुग्णालयात गंभीरस्थितीत जीवनावश्यक प्रणालीवर उपचार घेत आहेत अशा रुग्णांना खर्चाची प्रतिपूर्ती करण्यात येईल असे मा.मुख्यमंत्री महोदयांनी जाहीर केले आहे. त्या अनुषंगाने दि.०२/०३/२०१५ पासून खाजगी रुग्णालयात उपचार घेणाऱ्या रुग्णांना खर्चाची प्रतिपूर्ती देण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

दिनांक ०२ मार्च, २०१५ रोजी शासनाने जाहिर केल्या नुसार दिनांक ०२ मार्च,२०१५ पासून स्वाईन फ्ल्यू आजाराचे गरिब, आर्थिक दुर्बल घटकातील किंवा तत्सम रुग्ण जे खाजगी रुग्णालयात व्हेंटिलेटर (Ventilator) किंवा तत्सम लाईफ सपोर्ट वर उपचार घेत असतील अशा

रुग्णांना खर्चाची प्रतिपूर्ती शासनामार्फत करण्यात येईल. स्वाईन फ्ल्यूची साथ संपेपर्यंत सदर प्रतिपूर्ती अनुज्ञेय राहिल.

सदर रुग्णांना खर्चाची प्रतीपूर्ती करण्याकरिता खालील नमुद केल्याप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे. या समितीकडे अशी प्रकरणे संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा शल्य चिकित्सक अधिकारी यांनी निर्णयार्थ सादर करण्यात यावीत.

| | |
|---|---|
| अ) जिल्हाधिकारी | - अध्यक्ष |
| ब) जिल्हा शल्य चिकित्सक | - सदस्य |
| क) जिल्हा आरोग्य अधिकारी | - सदस्य |
| ड) अधिष्ठाता वैद्यकिय महाविद्यालये (वैद्यकिय महाविद्यालय असलेले जिल्हे) | - सदस्य |
| ई) खाजगी रुग्णालयातील मुख्य कार्यकारी अधिकारी किंवा मुख्य प्रशासकीय अधिकारी (एक) | -सदस्य |

सदर समितीने प्रस्तावाची छाननी करण्याकरिता बैठकीचे आयोजन करुन संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा शल्य चिकित्सकांमार्फत सादर करण्यात येणाऱ्या प्रस्तावांची छाननी करावी व खालील मार्गदर्शक सुचनानुसार प्रस्तावास मंजूरी द्यावी.

१) सदर प्रतिपूर्ती ही CGHS च्या दराप्रमाणे देय राहिल.

२) उपरोक्त समितीच्या निर्णयानुसार मंजूर प्रकरणी संबंधीत जिल्हाधिकारी यांनी स्वाईन फ्ल्यू आजारावर खाजगी रुग्णालयात उपचार घेतल्यानंतर संबंधित रुग्णाने रुग्णालयाचे देयक अदा केले असल्यास सदर रक्कमेची प्रतीपूर्ती रुग्ण हयात असल्यास संबंधीत रुग्णास आणि रुग्ण मृत्यू पावलेला असल्यास रुग्णाच्या जवळच्या नातेवाईकास करावी. तसेच खाजगी रुग्णालयातील उपचाराचे देयक रुग्णाने अदा केले नसल्यास, सदर रक्कमेची प्रतिपूर्ती संबंधित रुग्णालयास करावी.

३) स्वाईन फ्ल्यू रुग्णाने खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचाराची प्रतीपूर्ती सदर रुग्णास अन्य कोणत्याही माध्यमातून झाली असल्यास, त्यास या शासन निर्णयान्वे जाहिर केलेली प्रतीपूर्ती अनुज्ञेय नसेल.

स्वाईन फ्ल्यू या आजारावर खाजगी रुग्णालयात उपचार घेणाऱ्या रुग्णांच्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याकरीता मा.मुख्यमंत्री सहायता निधीतून रु.३.०० कोटी इतका निधी संचालक, आरोग्य सेवा,मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर निधी संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी आवश्यकते नुसार संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना त्यांचे मार्फत वितरीत करण्यात यावा. मुख्यमंत्री सहायता निधीतून उपलब्ध होणाऱ्या निधीची प्रतीपूर्ती सार्वजनिक आरोग्य विभागा

मार्फत करण्यात येईल. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी याबाबतचा प्रस्ताव विहित नमुन्यात/विहित कालमर्यादेत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२०१४४५१३९९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.03.23 13:29:46 +05'30'

**(ज. सु. जाधव)**
**कार्यासन अधिकरी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
४. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग (अर्थसंकल्प), (व्यय-१३), (अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.
११. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई.
१२. सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (आरोग्य-५).